**प्रशासकीय मान्यता**

इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथील न्यायवैद्यकशास्त्र विभागात जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत प्राप्त निधीमधून वातानुकुलीत यंत्रणा बसविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

शासन निर्णय क्रमांक : आयजीएन-२०१८/प्र.क्र.३०३/प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन संकुल, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक रोड, मुंबई-४०० ००१.

दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :**

१) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं/ इंगाशावैम/ डीपीडीसी निधी/वातानुकूलितयंत्र/ ९५४२/प(आय)/ १८, दिनांक : ११.९.२०१८

२) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांनी त्यांचे पत्र क्रमांक जिनिस/कार्या-३७/जिवायो/का-५/१३७५/२०१८-१९, दिनांक ०२.०८.२०१८

**शासन निर्णय :-**

विभागाच्या अधिपत्याखालील इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथील न्यायवैद्यकशास्त्र विभागात जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत प्राप्त निधीमधून अतिरिक्त वातानुकुलीत यंत्रणा बसविणेबाबत खालील तक्त्यात दर्शविलेल्या प्रमाणे एकूण रु.१२,६४,२३१/- (रुपये बारा लक्ष चौसष्ट हजार दोनशे एकतीस फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील सर्वसाधारण अटीं व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्थापत्य दुरुस्ती बांधकामाचे नाव | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | Providing Additional Air Conditioner to Forensic Department at IGGMC Premises Nagpur. | १२,६४,२३१ | १२,६४,२३१ |
| | **एकूण** | १२,६४,२३१ | १२,६४,२३१ |

अटी व शर्ती :-

१. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
३. कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अभियंता/अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
४. कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.
५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.: इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
६. संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ७.२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

२. सदर कामासाठी निधीची तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करु नये. याविषयी संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार विषयांकित काम इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांच्याकडून संदर्भाधीन क्र.०२ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या निधीमधून करण्यात यावे.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला - उप विभाग पाच मधील महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखाली प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार मधील अ.क्र.५, परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८२/इमा-३ दिनांक २४.०९.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११२१६०८५३७११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.11.12 17:42:17 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर, महाराष्ट्र.
२. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३. अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
४. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारत-३ ) मंत्रालय, मुंबई.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर .
७. निवडनस्ती (प्रशा-१)